**अनुकंपा तत्वावर नियुक्त्या देत असतांना महावितरण, महानिर्मिती व महापारेषण ह्या तिनही कंपन्यांमध्ये एकच धोरण राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३६०/ऊर्जा-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ :** दि.०९ नोव्हेंबर, २०२१ रोजी मा.मंत्री (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखाली झालेली आढावा बैठक.

**प्रस्तावना :**

ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली असणाऱ्या महाराष्ट्र राज्य विद्युत महामंडळाचे सन २००५ मध्ये त्रिभाजन होऊन महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी व महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी अशा तीन कंपन्या व ह्या तीन कंपन्यांची शिखर कंपनी म्हणून महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनीची निर्मिती करण्यात आली. असे त्रिभाजन करतांना संबंधित कंपन्यांनी त्यांचे नियम व Memorandum of Association नुसार त्यांच्या कर्मचाऱ्यांची नियुक्ती करण्याबाबतचे धोरण आखण्यात आले आहे. असे धोरण तयार करतांना तेथील विविध पदांवर अनुकंपा तत्वावर नियुक्ती देत असतांना वेगवेगळे धोरण आखण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे. अशा धोरणामध्ये तिनही कंपन्यांमधील अनुकंपा तत्वावरील नियुक्त्यांबाबत तसेच प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्त्यांबाबत एक समान धोरण आखणे आवश्यक असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आले. त्याअनुषंगाने शासनाने आता खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी व महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी अशा तीनही कंपन्यांमध्ये अनुकंपा तत्वावर नियुक्ती देत असतांना तिनही कंपन्यांमध्ये समान धोरण राबविण्याच्या दृष्टीने एक समिती गठीत करुन अनुकंपा तत्वावरील नियुक्त्या व प्रकल्पग्रस्तांना देण्यात येणा-या नियुक्त्यांबाबत एक समान धोरण आखून त्याबाबत शासनास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| (१) | महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनीचे संचालक (वित्त) | : अध्यक्ष |
| (२) | महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीचे संचालक (मानव संसाधन) | : सदस्य |
| (३) | महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीचे कार्यकारी संचालक (मानव संसाधन) | : सदस्य |
| (४) | महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनीचे कार्यकारी संचालक (मानव संसाधन) | : सदस्य |
| (५) | महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनीचे सचिव | : सदस्य सचिव |

अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी यांचे सल्लागार श्री.उत्तम झाल्टे हे सदर समितीचे कायम निमंत्रित राहतील.

समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

समितीद्वारे सध्या अस्तित्वात असणाऱ्या अनुकंपा तत्वावरील नियुक्त्या व प्रकल्पग्रस्तांचे समावेशन यासंदर्भात असणाऱ्या धोरणाचा अभ्यास करुन शासनाच्या नियमांशी सुसंगत असे एक समान धोरण तयार करुन असे धोरण शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावे.

समितीने याचा अहवाल सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढील एक महिन्याच्या आत देण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेताक क्रमांक २०२११२०६१६०७५०४६१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2021.12.06 16:10:10 +05'30'

**( प्र.पुं.बडगेरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव.
२. प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक.
३. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण, मुंबई.
४. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महानिर्मिती, मुंबई.
५. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महापारेषण, मुंबई.
६. महासंचालक, महाराष्ट्र उर्जा विकास अभिकरण, पुणे.
७. मुख्य विद्युत निरीक्षक, चेंबूर, मुंबई.
८. एम.एस.ई.बी. होल्डींग कंपनी, मुंबई.
९. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.
१०. निवड नस्ती.